
ईचा पूचा
कथा : कला शशीकुमार
अनुवाद : स्नेहलता दातार
चित्रे : अशोक राजगोपालन
ज्योत्स्ना प्रकाशन

# ईचा पूचा

(एक मल्याळम लोककथा)

लेखन : कला शशिकुमार

चित्रे : अशोक राजगोपालन

अनुवाद : स्नेहलता दातार




ज्योत्स्ना प्रकाशन

*Eecha Poocha (Marathi)*

प्रकाशक :
मिलिंद ल. परांजपे, ज्योत्स्ना प्रकाशन
'धवलगिरी', ४३०-३१ शनिवार पेठ
पुणे ४११०३०

मुंबई ऑफिस : मोहन बिल्डिंग
१६२ ज. शंकरशेठ मार्ग, गिरगाव, मुंबई ४००००४



ज्योत्स्ना प्रकाशनची पहिली आवृत्ती : २००९

मुद्रक : रिच प्रिंट्स, २७२ नारायण पेठ, पुणे ४११०३०

**मूल्य तीस रुपये**

ISBN 978-81-7925-202-4

TO ACHCHA, WHO TAUGHT ME DRAWING, AND AMMA, WHO LOVED EVERYTHING I DREW.

— ASHOK




एके दिवशी ईचा नावाची माशी आणि पूचा नावाच्या मांजराने
मिळून तांदळाची चविष्ट कणेरी बनवली.
(कणेरी म्हणजे भाताच्या
कण्यांपासून बनवलेला
पदार्थ. केरळमध्ये याला
कन्ही म्हणतात.)


पण कणेरी खायची कशी? त्यांच्याजवळ काही चमचा नव्हता.
म्हणून फणसाचे पान शोधायला ईचा भुर्रकन उडून गेली.
(केरळमध्ये कन्हीं खाण्यासाठी फणसाच्या पानाचा चमच्यासारखा उपयोग करतात.)


पूचाने भांड्यावर लक्ष ठेवायचं कबूल केलं होतं. पण तिला फार भूक लागली होती.
ना ती ईचासाठी थांबली, ना फणसाच्या पानासाठी. तिने सगळी कणेरी लपक् लपक् करत खाऊन संपवली.


आणि काय गंमत झाली, तिचं पोट फुगायला लागलं...
फुगतफुगत इतकं मोठं झालं की तिला धड बसता येईना,
किंवा उभंही राहता येईना. हैराण झालेली पूचा कशीबशी
चालत निघाली.



वाटेत तिला एक गाय दिसली. पूचा म्हणाली, ''अगं अगं गाई, आराम करणाऱ्या प्रेमळ गाई, मला जरा सांग गं, माझ्या या फुगलेल्या मोठ्या पोटाचं मी आता काय करू?'' गाय हळूच हंबरली आणि म्हणाली, ''मला नाही बाई माहीत. माझी राखण करणाऱ्या त्या मुलाला विचार!''

तो मुलगा झाडाखाली बसला होता. पूचाने त्याला विचारलं, ''अरे मुला, गाईची राखण करणाऱ्या शूर मुला, मला सांग रे, माझ्या या फुगलेल्या मोठ्ठ्या पोटाचं मी आता काय करू? ''शांतपणे रवंथ करत असलेल्या गाईला मी विचारलं, तर ती म्हणाली, माझी राखण करणाऱ्या मुलाला विचार. म्हणून तुला विचारते.''

हातातली काडी नाचवत मुलगा म्हणाला, ''मला नाही माहीत, माझ्या हातातल्या या काडीला विचार.''





पूचाने काडीकडे बघून विचारलं, ''काडी, अगं काटकुळ्या काडी, मला जरा सांग गं, माझ्या या फुगलेल्या मोठ्या पोटाचं मी आता काय करू?

''शांतपणे रवंथ करत असलेल्या गाईला मी विचारलं, तर ती म्हणाली, माझी राखण करणाऱ्या मुलाला विचार.
मुलगा म्हणाला, हातातल्या काडीला विचार.
म्हणून तुला विचारते.''

काडी सरळ उभी राहिली नि म्हणाली, ''मला नाही बाई माहीत. मी तर ह्या झाडावरून तुटून पडले, त्यालाच विचार!''





पूचा त्या डेरेदार हिरव्या झाडाजवळ गेली नि तिने विचारलं,
''झाडा, अरे उंच झाडा, मला जरा सांग रे, माझ्या या
फुगलेल्या मोठ्ठ्या पोटाचं मी आता काय करू?
''शांतपणे रवंथ करत असलेल्या गाईला मी विचारलं, तर ती
म्हणाली, माझी राखण करणाऱ्या मुलाला विचार.
मुलगा म्हणाला, हातातल्या काडीला विचार.
नि काडी म्हणते, तुला विचार. म्हणून तुला विचारते.''
वाऱ्यावर डोलत झाडाने उत्तर दिलं, ''मला नाही माहीत.
माझ्या फांदीवर राहणाऱ्या पक्ष्याला विचार.''


तो पक्षी आपली पिसं साफ करत होता.
पूचाने वर बघून त्याला विचारलं, ''ए पक्ष्या, अरे हुशार पक्ष्या, मला जरा सांग रे, माझ्या या फुगलेल्या मोठ्या पोटाचं मी आता काय करू?


"शांतपणे रवंथ करत असलेल्या गाईला मी विचारलं, तर
ती म्हणाली, माझी राखण करणाऱ्या मुलाला विचार.
मुलगा म्हणाला, हातातल्या काडीला विचार.
काडी म्हणाली, झाडाला विचार.
नि झाड म्हणतं, तुला विचार. म्हणून तुला विचारते."
"मला नाही माहीत!" पक्ष्याने उत्तर दिलं. "मला पकडू
पाहणाऱ्या पारध्याला विचार."

तो पारधी लांब रानात जाळं लावून बसला होता. पूचाने त्याला शोधून काढलं नि विचारलं, ''अरे पारध्या, पक्ष्यांची शिकार करणाऱ्या पारध्या, मला जरा सांग रे, माझ्या या फुगलेल्या मोठ्ठ्या पोटाचं मी आता काय करू?

''शांतपणे रवंथ करत असलेल्या गाईला मी विचारलं, तर ती म्हणाली, माझी राखण करणाऱ्या मुलाला विचार.




मुलगा म्हणाला, हातातल्या काडीला विचार.
काडी म्हणाली, झाडाला विचार.
झाड म्हणालं, पक्ष्याला विचार.
नि पक्षी म्हणाला, तुला विचार. म्हणून विचारते."
"मला नाही माहीत, माझ्याकडे ही सुरी आहे,
तिलाच विचार."

पूचाने सुरीकडे वळून तिला विचारलं, "अगं अगं सुरी, धारदार सुरी, मला जरा सांग गं, माझ्या या फुगलेल्या मोठ्ठ्या पोटाचं मी आता काय करू?

"शांतपणे रवंथ करत असलेल्या गाईला मी विचारलं, तर ती म्हणाली, माझी राखण करणाऱ्या मुलाला विचार.

मुलगा म्हणाला, हातातल्या काडीला विचार.

काडी म्हणाली, झाडाला विचार.

झाड म्हणालं, पक्ष्याला विचार.

पक्षी म्हणाला, पारध्याला विचार.

नि पारधी म्हणाला, तुला विचार. म्हणून तुला विचारते."





आपलं चमकदार टोक तिच्या पोटाजवळ नेत सुरी म्हणाली, ''तुला नाही का माहीत या तुझ्या फुगलेल्या मोठ्या पोटाचं काय करायचं ते? थांब जरा, मी तुला दाखवते काय करायचं ते!''


पूचा भयंकर घाबरली
नि धूम पळत सुटली.



अचानक ती वाटेत ईचावर आदळली.
बिचारी ईचा एक मोठं फणसाचं पान
ओढतओढत आणत होती.
"ईचा! ईचा!" पूचा किंचाळली.
"सांग गं मला! माझ्या या फुगलेल्या मोठ्या
पोटाचं मी काय करू?"

“काऽऽय? तुझं फुगलेलं मोठ्ठं पोट?” ईचाने विचारलं.
पूचाने खाली वाकून पाहिलं, पोट फुगलेलं दिसत नव्हतं.



ईचा लगेचच उडतउडत कणेरीच्या भांड्याकडे गेली.
तिने भांड्यात डोकावून पाहिलं, तर ते रिकामं होतं.
ती तडक परत आली आणि पूचाच्या अंगावर धावून गेली.
"आंऽऽ  तुझं पोट फुगलं होतं काय?"




पूचा पुन्हा पळत सुटली.



आता ती...

धारदार सुरीला मागे टाकून,

पारध्याला मागे टाकून,

हुशार पक्ष्याला मागे टाकून,

उंच झाडाला मागे टाकून,

काटकुळ्या काडीला मागे टाकून,

शूर मुलाला मागे टाकून,

शांत गाईला मागे टाकून,

....अगदी थेट घरापर्यंत गेली!



एक दिवशी ईचा नावाची माशी
आणि पूचा नावाच्या मांजरीने मिळून
तांदळाची चविष्ट कणेरी बनवली.

पण कणेरी खायची कशी?
त्यांच्याजवळ काही चमचा नव्हता.
म्हणून फणसाचं पान शोधायला
ईचा भुर्रकन उडून गेली.
पूचाने कणेरीवर लक्ष ठेवायचं कबूल केलं.

तिला फार फार भूक लागली होती.
तिने थोडा वेळ वाट पाहिली, पण तिला राहवेना.
मग ती ना ईचासाठी थांबली, ना फणसाच्या पानासाठी!
तिने सगळी कणेरी लपक् लपक् करत खाऊन संपवली.
आणि तिचं पोट फुगायला लागलं....




ज्योत्स्ना प्रकाशन
'धवलगिरी', ४३०-३१ शनिवार पेठ, पुणे ४११०३०
मोहन बिल्डिंग, १६२ ज. शंकरशेठ मार्ग, गिरगाव, मुंबई ४००००४
www.jyotsnaprakashan.com


